**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक-२२७९३३४४ Email ID : desk14.gad-mh@gov.in

.........................................................................................................................

**क्र. : संकीर्ण १३२४/प्र.क्र.८८/प्रशा-१.** दि.१९.०७.२०२४

**प्रति,**

सह सचिव /उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय : महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील मुख्य प्रशासकीय अधिकारी व आस्थापना अधिकारी (दक्षता) ही पदे प्रतिनियुक्तीने भरण्याकरिता इच्छुकता मागविण्याबाबत.**

संदर्भ : १.सा.प्र.वि.शा.नि.क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दि.१७.१२.२०१६.
२. सा.प्र.वि.शा.नि.क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दि.१६.०२.२०१८.
३.सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या.१४, दि.३१.०८.२०१७.

महोदय /महोदया,

संदर्भ क्र.१ येथील दि.१७.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भ क्र.२ येथील दि.१६.०२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर धोरणामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र.३ दि.३१.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी /कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे.

२. उपरोक्त शासन निर्णयांन्वये, विहित कार्यपध्दतीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई या कार्यालयातील खालील नमूद पदे मंत्रालयीन संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरावयाची आहेत.

| अ.क्र. | प्रतिनियुक्तीचे पद | समकक्ष मंत्रालयीन पद | प्रतिनियुक्तीने भरावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | मुख्य प्रशासकीय अधिकारी | उप सचिव<br>वेतनश्रेणी :S-२५ (७८८००-२०९२००) | १ पद |
| २ | आस्थापना अधिकारी (दक्षता) | अवर सचिव<br>वेतनश्रेणी :S-२३ (६७७००-२०८७००) | १ पद |

३. त्यानुषंगाने आपल्या विभागातील सर्व **उप सचिव तसेच अवर सचिव** संवर्गातील अधिकाऱ्यांना सदर प्रतिनियुक्तीबाबत अवगत करावे. सदर प्रतिनियुक्तीसाठी इच्छुक अधिकाऱ्यांचे मागील ५ वर्षांच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह वैयक्तिक माहिती, संपूर्ण सेवा तपशील, ना-विभागीय चौकशी प्रमाणपत्र, विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इ. माहिती, सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये नमूद केल्यानुसार या विभागाकडे दि.३१.०७.२०२४ पर्यंत निश्चितपणे प्राप्त होईल अशा रितीने पाठविण्यात यावी. तसेच सदर प्रतिनियुक्तीस कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास निरंक असेही या विभागास कळविण्यात यावे, ही विनंती.

४. तसेच, उपरोक्त पदांसाठी प्रतिनियुक्तीवर जाण्यास इच्छुक असलेल्या अधिकाऱ्यांनी परस्पर या विभागाकडे अर्ज करू नयेत. त्यांनी आपआपल्या विभागास अर्ज सादर करावेत. परस्पर अर्ज सादर केल्यास त्या अर्जाचा विचार करण्यात येणार नाही व त्याबाबत संबंधितास काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

५. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२४०७१९१७४८०७९००७ हा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**आपला,**

**सोबत: विवरणपत्र.**

GAJANAN SAHADEO PARAB

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=23bc53b7f4f1ca24ad7fdd55b639979816e6e784d75d5396d0f50367308ecc8b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6E3168FC30A0E07A9B8D13F2A24C658F97BA49C1AB3A023B1606696C22202DDD, cn=GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.07.19 18:01:05 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :** निवडनस्ती प्रशा-१.

## विवरणपत्र

| अ.क्र. | मुद्दा | तपशिल/अभिप्राय |
|---|---|---|
| १ | अधिकाऱ्यांचे संपूर्ण नाव | |
| २ | जन्मदिनांक | |
| ३ | शैक्षणिक अर्हता | |
| ४ | स्थायित्व प्रमाणपत्र | |
| ५ | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६ | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या (साक्षांकित प्रतीसह) छायाप्रती) मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.) | |
| ७ | मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का? | |
| ८ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९ | संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा) | |
| १० | मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३वर्षे पूर्ण झाली आहेत का? | |
| ११ | संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय? | |
| १२ | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे. | |